**सन १९७६ पूर्वीच्या पाटबंधारे प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन नवीन / विस्तारीत गावठाणात पुरवावयाच्या नागरी सुविधांच्या कामास प्रशासकीय / वित्तीय मान्यता व निधी मागणीबाबत.**

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग
शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०११/प्र.क्र.८०/र-८
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : **२४ मे,२०१२**

वाचा : १) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.संकीर्ण १०९७ /प्र.क्र.१८७/र-१,दि.४.७.१९९८
२) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.आरपीए १०९८/प्र.क्र.४०७/र-१,दि.२१.१.१९९९
३) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रआरपीए १०(२०००)प्र.क्र.२४२/र-१, दि.२६.९.२०००
४) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.आरपीए-२००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९
५) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र. आरपीए-०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८.३.२०११
६) शासन निर्णय वित्त विभाग क्र.१०.०८/प्र.क्र.७०/२००८ /विनियम, दि.१५ मे २००९.

**प्रस्तावना:-**

सन १९७६ पूर्वीच्या पाटबंधारे प्रकल्पामुळे बाधित होणा-या व्यक्तींचे पुनर्वसन करतांना त्यांच्यासाठी पुनर्वसन प्रयोजनार्थ स्थापन केलेल्या नवीन गावठाणात महाराष्ट्र प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम, १९९९ च्या तरतुदीनुसार व विस्तारीत गावठाणांत नागरी सुविधा प्रचलित शासकीय आदेशानुसार पुरविण्यात येतात. नागरी सुविधांच्या कामांसंदर्भात वरील संदर्भ क्र.१ ते ३ येथील अन्वये प्रशासकीय मान्यता / वित्तीय मान्यतेसंदर्भात शासनाने वेळोवेळी आदेश निर्गमित केले आहेत.

शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दि.१५ मे २००९ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७(२) (अ) नुसार योजनेला किंवा प्रस्तावाला ( वित्तीय मंजुरी धरुन ) अनावर्ती खर्चाच्या बाबतीत प्रशासनिक विभागांची वित्तीय अधिकाराची मर्यादा वाढविण्यात आली आहे. तदनुसार प्रशासनिक विभागांचे वित्तीय अधिकार तसेच प्रशासकीय मंजुरीचे अधिकार विभागीय आयुक्त तसेच जिल्हाधिकारी यांना प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार सन १९७६ पूर्वीच्या पाटबंधारे प्रकल्पामुळे बाधित होणा-या व्यक्तींच्या पुनर्वसन विषयक नागरी सुविधांची कामे विनाविलंब व्हावीत याद्दष्टीने आता शासनाने खालील निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय:-

१) वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार योजनेला किंवा प्रस्तावाला वित्तीय मंजुरीसह प्रशासकीय मान्यता देण्याच्या प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारापैकी नागरी सुविधांच्या कामांसाठी रुपये १ कोटी पर्यंतच्या अंदाजपत्रकास वित्तीय मंजुरीसह प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार

जिल्हाधिकारी यांना व नागरी सुविधा कामांच्या रुपये १ कोटीपेक्षा जास्त व रुपये ५ कोटीपर्यंतच्या अंदाजपत्रकास वित्तीय मंजुरीसह प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार विभागीय आयुक्त यांना प्रदान करण्यात येत आहेत. रुपये ५ कोटीपेक्षा अधिक रकमेच्या नागरी सुविधा कामांच्या अंदाजपत्रकास वित्तीय मंजुरीसह प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार शासनास राहतील.

२) जिल्हाधिकारी व विभागीय आयुक्त यांनी प्रकरणपरत्वे नागरी सुविधांच्या कामांच्या अंदाजपत्रकांना वित्तीय मंजुरीसह प्रशासकीय मान्यता प्रदान करताना यासंदर्भातील प्रचलीत सर्व शासन आदेश / नियमांचे पालन होईल याची दक्षता घ्यावी व स्वतंत्र कामांसाठी स्वतंत्र आदेश याप्रमाणे निर्गमित करावेत. तदनुसार संबंधित जिल्हाधिकारी व संबंधित विभागीय आयुक्त यांनी नागरी सुविधा कामाच्या अंदाजपत्रकांस संबंधित प्रकल्प यंत्रणेचे अधिक्षक अभियंता यांची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर त्यास वित्तीय मंजुरीसह प्रशासकीय मान्यता प्रदान करुन मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-१०, ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००)(०३) इतर प्रकल्प (४७०१-एच-७२७)/(४७०१००२५) (योजनांतर्गत) (दत्तमत) खाली आवश्यक निधी मागणीचे प्रस्ताव शासनास सादर करावेत.

३) नागरी सुविधा कामांसाठी निधी मागणी प्रस्तावांसोबत कामांची अंदाजपत्रके, कामांच्या अंदाजपत्रकांना संबधित अधिक्षक अभियंता यांची तांत्रिक मान्यता आदेश, वरील मुद्या क्र.१ च्या अनुषंगाने जिल्हाधिकारी/विभागीय आयुक्त/शासन यांचे प्रशासकीय मान्यता आदेश, नागरी सुविधांवरील खर्च हा ५% खर्च मर्यादेतच असल्याबाबतचे प्रमाणपत्र, करण्यात येणारी नागरी सुविधा कामे ही अन्य योजनेत नसल्याचे सक्षम प्राधिकाऱ्याचे प्रमाणपत्र, संबंधित प्रकल्पांतर्गत शिल्लक नागरी सुविधांची माहिती इत्यादि आवश्यक कागदपत्रे सोबत जोडण्यात यावीत.

४) नागरी सुविधा कामांसाठी निधी मागणी शासनास सादर करतानाच नागरी सुविधा कामांची निविदा प्रक्रिया सुरु करण्याबाबत संबंधित प्रकल्पयंत्रणेचे अधिक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांना कळविण्यात यावे.

५) जिल्हाधिकारी यांनी रुपये १ कोटीपर्यंतच्या नागरी सुविधा कामांचे प्रस्ताव विभागीय आयुक्त यांचेमार्फत शासन मान्यतेसाठी सादर करावेत.

६) वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उप विभाग तीन अनुक्रमांक ६ परिच्छेद क्र.२७ (अ) अनुसार या नियमपुस्तिकेतील अनुक्रमांक ४ व्दारे अगोदर मान्यता देण्यात आलेल्या नागरी सुविधांच्या कामांच्या प्रस्तावांसंदर्भात सुधारित अंदाजातील आधिक्य सुरुवातीस मंजूर केलेल्या अंदाजित खर्चाच्या १५% मर्यादेपर्यंतच्या खर्चास वित्तीय मान्यतेसह सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचे प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर करण्यात यावेत. मूळ अंदाजित खर्चापेक्षा १५% पेक्षा अधिक खर्चास वित्तीय मान्यतेसह सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचे प्रस्ताव वित्त विभागाच्या सहमतीसाठी शासनास सादर करण्यात यावेत.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३०२/विनियम, दि.१७.५.२०१२ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दि.१५.५.२००९ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग पहिला उप विभाग-तीन अनुक्रमांक ४, परिच्छेद क्र.२७(२) व अनुक्रमांक ६ परिच्छेद क्र.२७(अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१११०२४३०२२९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( विक्रम ढमाळ )**
**कार्यासन अधिकारी**
**महसूल व वन विभाग**

प्रति,

सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा पुनर्वसन अधिकारी,
महालेखापाल ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१, मुंबई
महालेखापाल ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-२, नागपूर
पाटबंधारे विभाग, मोप्र -१, मोप्र (प्र), मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०/विनियम/व्यय-६, मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग, (निवि- १४७५,१४६१ कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
अवर सचिव (पीएसी) कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, ब-१/ब-२, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, र-१, र-३ व र-४ महसूल व वन विभाग,मंत्रालय, (प्रत्येकी १० प्रती)
निवड नस्ती - र-८, कार्यासन, महसूल व वन विभाग.

* * *